


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एक १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६ / फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ९. जून, सन १८८६. अंक ६

प्रकाशक (एडिटर)

**जनार्दन बाळाजी मोडक, बी. ए.**
व
**काशिनाथ नारायण साने, बी. ए.**

हें मासिक पुस्तक

**पुणें येथें**

ज्ञानप्रकाश छापखान्यांत छापिलें.

किंमत ८ आणे.



अनुक्रमणिका

# विक्रीस तयार.

खालीं लिहिलेलीं उपयुक्त व मनोरंजक पुस्तकें हीं आमचे आफिसांत विक्रीस तयार आहेत. खालीं लिहिल्या प्रमाणें रोख पैसा पाठविला असतां पाठविण्यांत येतील.

काव्येतिहास-संग्रहाचे व्यवस्थापक.

| | पुस्तकाचें नांव. | ऐन किंमत रु० | टपाल खर्च |
|---|---|---|---|
| १ | पेशव्यांची बखर— | १८४ | ८२. |
| २ | श्री० भाऊ साहेबांची बखर | १ | ८१८६ |
| ३ | मुक्तेश्वरकृत वनपर्व | २ | ८२॥ |
| ४ | श्री० शिवछत्रपतींचें चरित्र | १ | ८१॥ |
| ५ | बामनी प्रकरणें ४५ | २ | ८२॥ |
| ६ | श्री० छत्रपती संभाजी महाराज व राजाराम महाराज यांचीं चरित्रें | ८१५ | ८१. |
| ७ | साष्टीची बखर* | ८४ | ८८६ |
| ८ | ब्रह्मेंद्रस्वामींची बखर* | ८५ | ८१ |
| ९ | श्री० थोरले शाहूमहाराज यांचें चरित्र | १ | ८१ |
| १० | श्री० पंत प्रधान यांची शकावली* | ८६ | ८८६ |
| ११ | मोरोपंतकविकृत प्रकरणें भाग १ ला | २ | ८२८६ |
| १२ | अनेककविकृत प्रकरणें भाग १ ला | २ | ८२८६ |
| १३ | श्री० धाकटे रामराजे व धाकटे शाहूमहाराज यांचीं चरित्रें | १ | |
| १४ | पाणिपतची बखर | ८८ | |
| १५ | खर्ड्याच्या स्वारीची बखर | ८४ | |
| १६ | नागपूरकरभोंसल्यांची बखर | १८१२ | |
| | विठ्ठलकविकृत बिल्हणचरित्र* | ८२ | |
| | विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांची बखर * | ८२ | |
| | राजव्यवहारकोश | ८३ | |
| ६ | कालेयकुतूहलम्* | ८५ | |
| ७ | श्री शिवकाव्यस्य पूर्वार्द्धम् | १८८ | |
| ८ | पंत विठ्ठलविरचितं-सुश्लोक लाघवम् | १८५ | |
| ९ | युवराजकविकृत रामकाव्यम् | १ | |
| | पुष्पबाण विलास | ८१८६ | |
| | अमरुशतक | ८६ | |

ज्यांच्या नांवावर * अशी फुली केली आहे तीं प्रकरणें सुटीं लेलीं नाहींत. बांधून पाहिजे असल्यास त्याबद्दल खर्च ८१ निरा



अनुक्रमणिका

# विषयक्रम.

बखरी.





अनुक्रमणिका

स्वारीचा कूच होऊन जेजोरीस आले. देवदर्शन होऊन पुण्यानजीक यान- घडीचे आलीकडे पांच कोस हडपसरावर फौजेचा मुक्काम झाला. कंपू दोन कोश पुढे वाढवून राहिले. श्रीमंतांपाशीं वकील पाराशर दादाजी व गोपाळराव गानू खासगीवाले होते. पेशजी जामपूर मोराण्याचे मुक्कामीं स्वारी असतां श्रीमंतांकडील वकील बोलण्यास आले होते. त्यांत हांसल, तुम्ही सरकार पदरचे सरदार, व तुमचे वडिलांवाडिलीं दौलतीस जपणें कसें हें माहीत असतां तुम्ही लाखों फौजा घेऊन स्वदेश खानदेशांत श्रीमंतांचे महालांपासून लाखों रुपये घेऊन लुटीत जाळीत [ आलां ] यांतील अर्थ काय ? तुमचा मनोधर्म समजला पाहिजे. या पूर्वीं सवाई मल्हारराव मारले गेल्यावर यशवंतराव नागपुराकडे गेले. विठोजी होळकर पंढरपुराकडे गेले त्यांनीं कांहीं जमियत करून दंगा आरंभिला. तों पुण्यास कारभारी बाळोजी कुंजीर होते त्यांनीं फौज पाठवून विठोजी होळकर याजला हस्तगत करून पुणें मुक्कामीं आणून हत्तीचे पायीं मारून टाकि- लें. हा द्वेष महाराजांचे मनांत. मग जामपूर मोराण्याचे मुक्कामीं सदहू अन्वयें प्रश्न केल्यावर यांनीं उत्तर केलें कीं, " श्रीमंत आमचे धणी, इष्ट आराध्य. आम्ही सेवक लोक. चाकरी झाली न झाली हें कैलासवासी वडिलांस ठाऊक. व श्रीमंतांचे ध्यानांत. परंतु आमचे ऐकिण्यांत कैलासवासी खंडेराव होळकर व मालराव व सवाई मल्हारराव होळकर आम्हां पावेतों कसकशा अनौंवळ्या श्रीमंतांच्या राज्यांत केल्या कीं, ज्यांत लाखों रुपये नुकसान व स्वाधिन होण्यास फौज खर्ची लाखोंच लागले. परंतु हस्तगत केल्यावर अवघ्या गोष्टींचा बंदोबस्त करून हजारों रुपये सरबरा खर्ची देऊन जेथील तेथें पावतेच करीत आले. विठोजी होळकर यांजकडून स्वामींची अवज्ञा अथवा अनावळी तादृश केली नव्हती. तथापि वा- ळुंकाचे चोरीस बुक्यांचा मार. आपण धणी, पदरचे माणासस अमार्गांचे मार्गास लावावें यास्तव शिक्षा अन्याया सारखी क्रोध वश्य? आपले मनांत आलें. यश- ही आलें असतां आमचे भाऊ बराबरीचे शिंदे, विंचूरकर, नारो शंकर वैगेरे बरोबरीचे त्यांवरही प्रसंग पडले तेथें मल्हारजी होळकर, तुकोजी होळकर यांनीं अन्यायाचें माफक करून घेतलें. वाजता वारा लागूं दिला नाहीं. श्रीमंतही मान्य करीतच आले. आमचे प्रसंगीं आमचे भाऊ दालीबंदें लहान मोठे एकानें- ही रदबदली न करितां रंगांत रंग मिळविला व स्वामींनीं ही आदि पश्चात् विचार न पाहतां वाळकाचे चोरीवर प्राण घेतला. त्यास एक्या खेडयांत पाटील तरी गांवचा जमीनदार असतो, परंतु असामी पांच पंचवीस बिघ्याचा खेडू त्याजवर

६४. अनावळी=खोडी.

६५. वाळुक=कांकडी.

६६. दालीबंद=तरवारीचा कमरपट्टा ला- वलेले, तरवार बहादर.

मोरजुलूम जाहला असतां बे रो म होऊन गांव जाळीत असतो, त्याचेंही समाधान करून झाल्या गोष्टीचा बंदोबस्त होऊन जमिनीवर कायम करावा लागतो. तेव्हां आम्ही लहान मोठे आपले पायांपाशीं उभे राहणार, आमचे समाधान शांतवन खावंदांनीं व बराबरीचे भाऊ यांनीं काय केलें ?" असें बोलणें पडल्यावर कायल होऊन आज्ञा घेऊन गेले.

मग महाराज सदरीं लिहिल्या अन्वयें बाँड चांदवडास ठेवून सडे हडपसर पावेतों आले. नंतर बाराजीपंत बाबास पत्रे गेलीं. श्रीमंतांस विनंती करावी कीं, "आम्हीं सरकार पदरचे, साहेबचाकरीस काया वाचे मन:पूर्वक हजर. स्वामींचें दर्शन घेऊन बंधूचा अंदेशा व फौजा बाळगून परिश्रम करून करोडों रुपये देण्याचे पेंचांत, इत्यादि मुखे कढून गि रा सी नें हे स्वामींचे चरणीं समर्पक करून, दुःखापासून वेगळे होऊन आज्ञा होईल ती चाकरी बजावूं. स्वामींचे पायाशीं दुसरा अर्थ कांहीं एक नाहीं. आम्हीं उभयतां शिंदे, होळकर. आमचीं जीं वांकडीं असतील तीं आपसांत समजून तमाशा आपण पाहवा." या भावीं बोलणीं उभयतां बोलले. परंतु श्रीमंतांस कांहीं एक विश्वास न पटतां श्रीमंतांनीं सरंजाम सदाशिवराव शिंद्यांकडील व सरकारचे विंचूरकर वगैरे फौज वानवडीस आली. इकडील कंपू पुढें होतेच. फत्तेसिंगराव माने फौज कंपूसुद्धां बरोलीस होते. त्यांनीं त्यांचे मुकाबल्यास जरीपटका व मानकरी पुरंधऱ्याचे बराबर देऊन रवाना केले होते. त्यांची लढाई होऊन जरीपटका पुरंधरे सांपडले नाहींत. बाकी तोफा आणून फौज लुटून घेतली. मालोजीराव घोरपडे पाडाव करून आणले. फत्तेसिंगानें घोरपड्यांची उजूतवाजू उत्तम प्रकारची ठेवून जखमांचा जाबता करून वस्त्रें देऊन रवाना केलें. माने फौज सुद्धां बरोबरच होते. त्रयोदशीस रात्रीं लढाई नक्षा झाला.

पुढें तिन्ही कंपूची लायन. कंपू शेजारी फत्तेसिंग माने. उजवे बाजूस मीरखान बाबा. मागें कंपूचे पाठीवर महाराज हुजुरात शिलेदार घेऊन उभे. चतुर्दशीस सुर्योदयीं लढाई सुरू जाहली. तोफा चालू जाहल्या. शिंद्यांकडील पलटणचा मार जरब पडला. फौज थिजली. हें पाहून, महाराज हुशार होऊन, कंपू मागें टाकून, हुजुरात घेऊन घोडे तोफांवर घातले. महाराज उठले पाहून मागें डावे बाजूस माने होते त्यांनींही अनीना उचलल्या. इकडील फौज मीरखान होता त्याजवर चाल केली. तों महाराजांनीं तोफाखाना घेऊन

---

६७. कायल होणें=सगाखणें.

* बाड=तंबूच्या कनाथी, आडोसा, जनानखाना.

६८. थिजली=थकझाली, मागें पाय घेऊं लागली.

शिंद्यांची फौज मीरखानावर उठली तिच्या पिछा कडून घोडे घातले. दुरोख अडचण पडल्या मुळें फौज लुटून घेतली. इकडे माने उठले होते त्यांचा मुकाबला विंचूरकर यांनीं चांगला केला. परंतु अवघ्या फौजेचा मार झाला तेव्हां त्यांनीं हवा पाहून एकीकडे जहाले. श्रीमंतांकडील जरीपटका घाशीरामाचे तलावावर उभा होता तो पळून शहरांत गेला. तोफा जाऊं पावल्या नाहींत. शिंद्यांचे तोफखान्यावर महाराजांनीं घोडे घातले तेथें छऱ्याच्या जखमा आल्या. लढाई फत्ते झाली.

श्रीमंत माघारीं पर्वतीस गेले. सदाशिवराव परभारें निघोन नगरचा किल्ला नजीक केला. श्रीमंत पर्वतीस एक घटका ठरून, धीर न निघे तेव्हां निघोन लोहगडाखालीं होऊन महाडास गेले फत्तेसिंग माने व बाळाजी कृष्ण निसबत फडणीस उभयतां श्रीमंतांचे मागें पाठविले कीं, आपण जाऊं नये, पुण्यास यावें, यास्तव. परंतु त्यांणीं यांशीं गांठ पडूं न देतां निघून गेले. तेही माघारे आले. मग फत्तेसिंग राव माने आपले फौजेसुद्धां पंढरपुराकडे रवाना करून आपण फौजसुद्धां पुण्यावर मुक्काम करून राहिले. मग जुन्नराहून अमृतराव साहेब येऊन बाबा साहेब फडके व मोरोबा फडणीस असे तीन चार महिने पुण्यावरच होते. कांहीं राजकारण करावें असा बेत परंतु श्रीमंतांनीं कंपनी साहेब याचा आश्रय करून वसली साहेब पलटणें घेऊन पुण्याचे सुमारास आले.

मग यशवंतराव होळकर यांनीं मनसोबाचे धोरण पाहून, अमृतराव साहेब वगैरे राजकारण तेथील तेथें सोडून, झाडून कूच करून फाल्गुन शुद्ध ४ स श्री जेजुरीस जाऊन, श्री मार्तंडाचें दर्शन घेऊन पारनेरचे मार्गें संगमनेरावरून बेलापूरचे मार्गें पुणतांब्यास आले. तेथें आठपंधरा मुक्काम होऊन औरंगाबादेस आले. मागें फत्तेसिंग माने फितुरांत येऊन, सरकारचे दरखदार कारकून होते ते कैद करून, फौज श्रीमंतांकडे घेऊन जाऊं अशा विचारांत, सरकारांतून फौजा दरोबस्त कहाडण्याकरितां कृष्णाजी लक्ष्मण माने यांस आणावयास पाठविलें. त्याजलाही अटकेंत ठेविलें. हें वर्तमान माने यांचे बराबर स्वारींत पठा-

६९. विकर्स, हार्डींग, आर्मस्ट्रांग या तिघांच्या हाताखालीं १४ पलटणें ५००० पायदळ, आणि २५०००. स्वार, इतकी फौज यशवंतरावाकडे होती. शिंद्यांचीं १० पलटणें, स्वार व पेशव्यांची हुजरात पागा, विंचूरकर वगैरे सरदार अशी फौज होती. हुजरात पागेनें होळकराच्या घोडेस्वारांचा पराभव केल्यावर यशवंतरावानें पुढें होऊन हल्ला केला. आणि घोडेस्वारांचा पराभव करून शिंद्यांचीं ४ पलटणें धीर धरून भांडत होतीं त्यांवर जाऊन पडला. तेथें गोलंदाज लोकांचीं डोकीं स्वतः उडवून पलटणांचा त्याणें धुवा उडविला. या लढाईंत यशवंतरावानें मोठा पराक्रम केला प्रत्येक हल्ल्यांत तो पुढें होता. त्यास जखमाही लागल्या. एक बर्चीची व एक तरवारीची. ग्रां॰ डफ.

७०. "सिंहगड" असें पाहिजे होतें.

अनुक्रमणिका

णाचे स्वार दाहा एक्या पैकीं होते त्यांजला समजून त्यांनीं आपसांत विचार केला कीं, हवा बदलून माघारां मान्या चालला आहे. आपले बेड्यांत गेल्यावर मुस्तकीम होऊन आपला बस राहणार नाहीं. ते पक्षीं त्या ठिकाणींच याजला बसांत आणून कैद करावा आणि महाराजापाशीं घेऊन जावें. यासाठीं घडेल तसें घडो. असें बोलून मान्याची पालखी घेरली. मान्या निजला होता. दहाजणांनीं घोडे सोडून भोयांचे खांद्यावरून पालखी उतरून कटारा लावून बसले. त्यांचे बेड्यीं-पैकीं कोणीच नव्हते. यांनीं याजला घेऊन सरकारी सरमजाम मराठे व पागा पठाण वगैरे एकत्र करून हुशार केले. हें वर्तमान मान्याचे खासगत बेडवाले कृष्णाजी लक्ष्मण व रावजी त्रिंबक यांजला घेऊन चालले होते त्यांजला हें वर्तमान समजल्यावर उभयतांस सोडून देऊन, मान्याची आशा सोडून, आपण निघून गेले. उभयतां ब्राम्हण जौबत्याबरोबर नाहींत. तथापि धण्याचे नांव घेऊन चालले. मार्गांत दहा पांच एक दोन असे स्वार लुंगारीचे भेटत गेले. तेच बराबर घेऊन, जमाव करून, दिवस रात्र चालून मान्यास मिळविलें. मग फौजेची दिलजमाई करून, मान्याचे पायांत बेड्या घालून, पालखींत टाकून औरंगाबादचे मैदानांत महाराजांस सामल जाले. असेच मीरखां पंढरपुराकडे होता तो लुटीचे चालचीवर राहिला होता. पत्रें निकडीचीं गेलीं असतां त्याचें येणें न होय. मग तात्या आळेकर याजला आणावयास रवाना केलें. कारण दुधानें पोळलेल्यावर ताक फुंकणें प्राप्त. मान्या मराठा, त्याजपासून हरामखोरी जाली. तेव्हां याचा भरंवसा तो काय ? याजमुळें पंत मशारनिले पाठवून त्याजला घेऊन आले. मागील प्रकार [ नि ] घोर जाल्यावर अवरंगाबादेपासून चार रुपये घेऊन फौजे सुद्धां कूच करून बेरुळावरून त्रिंबकेश्वरीं आले. पुढे घोडपेचे मार्गें चांदवाडास येऊन बाड बराबर घेऊन कोपरेलीस तापीतीरीं आले. पुणें मुक्कामीं भोंसल्याकडील वकील आले होते. ते निरोप घेऊन नागपुरास जाते समयीं बोलण्यांत आलें कीं, खंडेराव होळकर बाया वगैरे मल्हार शामजी सुद्धां दौलतराव शिंदे याजपाशीं आहेत ते तुमचे तुम्हांकडे पाठवून तुमचा त्यांचा वडिलोपार्जित स्नेह चालत आला तसा सल्लोका करून देऊं. ते नागपुरास गेले. भोंसले सरमजाम सुद्धां वऱ्हाड प्रांतीं येऊन शिंदे [ व ] ते एके ठिकाणीं होते. त्या प्रसंगीं बोलण्याचे भाव शिंद्यांस दर्शवून नमूदास आणून महाराजांस पत्रें पाठविलीं कीं, शिंदे यांशीं बोलून मजकूर

७१. बेडा, बेहडा=टोळी.
७२. जाबता=टोळी.

७३. लुगार= लुटारू टोळी.

नमूदांस[७४] आणिला आहे. आपल्या कडील मुखत्यार बोलणार पाठवून द्यावा. त्याचें उत्तर लिहिलें कीं, "शिंदे आम्ही भाऊ. त्यांचा आमचा सलूख तो काय ? सलुख्याचे चालीचीं निदर्शनें होत गेलीं म्हणजे सलूख अर्थात् आहे. आमचें खटलें आम्हांपाशीं आलें म्हणजे सहजच सलूख. बाकी मूल येथें आलें अथवा तेथें असलें सारखेंच. आपण लिहिलें ते पक्षीं सदई अन्वयें व्यवहार झाल्यानंतर कोणास पाठविणें ते पाठवून देऊं." नंतर जातांच शिंदे व भोंसले यांजवर वसली साहेब अमृतराव साहेब घेऊन मुकाबल्यास आले. तेव्हां मसलत गा ल व झाली. यास्तव समेट होऊन एकदिली त्रिवर्गांची झालियावर कठीण पडावयाचें नाहीं या धोरणावर खंडेराव होळकर खटल्या सुद्धां शिंदे यांनीं रवाना केले. ते नजीक खरगोण सन १२१३ चे सालीं येऊन दाखल जहाले. शिंदे आपण एकत्र होऊन पलटणें कौंटून[७५] टाकावीं ही गोष्ट कारभारी खंडो महादेव बाळाजी कृष्ण सर्वांचे मनास आली. महाराजांचा रुकार पडेना. मग सर्वांनीं हरनाथ याजला पुढें करून महाराजांपाशीं बोलविलें कीं, शिंदे भोंसले आपण एकत्र होऊन मसलत उचलली असतां आपलें नुकसान तें काय ? या भावीं मनसोब्याचें धोरण धरून बहुतां प्रकारीं बोलला. त्यांशांनीं उत्तर केलें कीं, "तुजला वाटतें दौलत मी चालवितों, माझ्या भरंवशावर महाराज स्वस्थ आहेत. परंतु हरनाथ एक आणि एकुणपन्नास हरनाथाची करामत मी खेळवून तुझा पल्ला राखितों. तुझे भरंवशावर मी आहें [ ही ] गुमराई एकरूप मनांत न आणितां सांगितलें तितकें काम करून असावें. इतःपर बोललास तर कामास पडणार नाहीं." तेव्हां त्यासि असें जालें कीं, मी यांचे वेगळा कसा होऊं. तात्पर्य नासो कीं सुधरो वडिलांचे हातचीं माणसें होतीं, त्यांचेही माथां भार न कारितां सांगितलें काम ज्याचें त्याचें हातें घेऊन इतिकर्तव्यता आपली आपण करावी, भरंवसा व विश्वास आपला आपल्यास. अशा धोरणावर प्रवृत्ति होती.

खंडेराव होळकर खटल्यासुद्धां दाखल झाल्यावर पूर्व भाषणाचे निदर्शनार्थ मल्हार शामजी व माधवराव गोविंद आळेकर या उभयतांची रवानगी शिंद्यांकडे केली. आपण कूच करून भाद्रपद शुद्ध १४ स फौज नर्मदेचा घाट उतरून उत्तरतीरास मुक्काम जाला. जातीनें खांसा स्वारी महेश्वरीं येऊन आठ दिवस मुक्काम होऊन कुटुंबासुद्धां कूच जहालें. ते उज्जनी नजीक दसरा करून मंदोसरावरून मेवाडांत शहापुरास स्वारी आली. दिपवाळी तेथें करून पुढें कूच होऊन फाल्गुन अखेर अजमिरावरून हर मा डा स आले. तों दिल्लीहून पलटणें आलीं. हरमाड मुक्कामीं कांहीं कहीशीं गांठ पडली. कुटुंबें बरोबर

७४. नमूदास=ठरावास. | ७५. मूळांत 'टाकून' असें आहे.

यास्तव जोधपूरचे राजाशीं संधान लावून, त्यांचीं पत्रें आणून, तेथून कारकून पाठवून, बाड जोधपुरीं ठेवावें हा बेत करून, पुष्करास येऊन, खटले खंडेराव होळकर सुद्धां कांहीं सरमजाम देऊन जोधपुरास रवाना केलें. आपण सडी स्वारी करून हाडोतींतून गंगराडेवरून मंदोसरास ज्येष्ठमासीं अखेर सालीं आले. तेथें एक महिना मुक्काम [ झाला. ] फिरंगी[७६] याजकडील पलटणें हरमाड्याचे आसपासून गेलीं तीं नीट कोट्यास गेलीं. कोटेवाल्याची फौज व बापू शिंदे बराबर घेऊन दऱ्याचे मार्गानें उतरून रामपुरा व हिंगळाजगडा खालीं वगैरे जप्ती बसवून गरोठे नजीक आले. हे वर्तमान मंदोसर मुक्कामीं समजतांच तेथें लोकांची दिलजमाई करून ज्येष्ठ वद्य अमावास्येचे दिवशीं पलटणावर चाल केली. अंतुरचे घाटें चर्मवती उतरून सडा घोडा राऊत ऐशी हजार स्वारांच्या भरंवशावर तवा तोबरा बांधून अग्नीचा कल्होळ असा येऊन गरोठेहून दोन कोसांवर मुकाबला जाला. लढाई फार मातबर जाली. फिरंगी लढाई हरून मुकुंददऱ्याचे मार्गें निघाला. कोटेवाल्याची सरमजामाचीं माणसें फार करून कामास येऊन सरदार धरला. एक फिरंगी खासा मुकत्यार बासतआलीखां बंगस यानें घोडा उठवून हत्तीवर मारला. वरकड गोरे व पलटणें, तोफा, डेरे जेथील तेथें राहून सडे निघाले. कोटेवाल्यांनीं फिरंग्यास नाव देऊन चर्मण्वती पार उतरून दिल्हे. व मागाहून सडी स्वारी कोट्यास दाखल झाली. कोटेवाल्यावर माहाराजांचा दांत. कारण फिरंग्यास सामल होऊन त्याजला काढून दिल्हे. आम्हांस मुकुंद दऱ्याचा दरवाजा लावून अटकाविलें. यावरून कोटें खोदून चमेलींत टाकावें हा इरादा. परंतु मसलतीचें धोरण सोडून इकडे गुंतल्यास फिरंग्यास सोहोलत पडेल, यास्तव कोटेवाल्याचा अन्याय पदरीं त्याचे घालून, कांहीं पैका घेऊन चर्मण्वती उतरले. तों बाजीराव बापूजी पदरचे शिलकी चाकर इंद्रगडीं होते. लाखेरीचे डोंगराचे माहीतगार. त्यानें सरकारचाकरीवर लक्ष देऊन, भिल्ल जमा करून, जागाजागीं नाकीं बांधून पलटणें फार करून लुटून घ्यावीं, आंगरखे व बंदुका गाड्यावर घालून आणले. बुंदीचे आसपास महाराजांस येऊन भेटला. मर्जी बहुतच प्रसन्न होऊन टोंक, रामपुरा, लाखेरी वगैरे मामले सांगितले. यांजकडे फिरंग्याशीं गांठ बनास नदीवर श्रावण वद्य ४ स घालून झटपट तेथें बरीच जाली. माणसें किती मारलीं किती नदींत उड्या घालून गेले, त्याजवर घोडे घालून पाण्यांत मारले. त्या लढाईंत सरशी इंग्रजांचीच झाली. इकडील कंपूचा मालक माणखासिंग मारला जाऊन तोफा त्यांनीं घेतल्या होत्या. परंतु महाराज भाग्यवान्, व पराक्रमाची

७६. फिरंगी=इंग्रज. शिंद्यांशीं तह झाल्यावर होळकर यांशीं इंग्रजांनीं लढाई चालविली. जनरल लेक, मान्सन, वगैरे मंडळी होळकरावर पाठविली होती.

पराकाष्ठा, जातीनें तोफेवर येऊन, छरे भरून, तोफा आपण चालवून शेंकडों माणसें मारलीं. नंतर घोड्यावर आपण स्वार [ होऊन ] घोडे घातले. या प्रमाणें तीही लढाई फत्ते करून पिच्छावर चालले. नदीस पाणी यामुळें तोफा उतरूं पावल्या नाहींत. सडा घोडा राऊत उतरून पाठलाग करून कंपू मागें टाकले. तोफा पलटणास *सावर न फावतां किल्ले खुशालगड प्रांत धुंडाड जयपूरवाल्याची जागा त्यांत शिरले. बाहेरून महाराजांनीं घेरा घातला. फिरंग्यांनीं ओझें पाझें आसबाब[७७] होता तो तेथील तेथें टाकून सडे माणूस बंदूख घेऊन मागील रात्रीस निघाले. तों मुकाबल्यास चिमणाजी कृष्ण याचें पथक होतें. त्याजवर ताशेरा देऊन बाहेर पडले. ते आग्र्याचे मार्गें गेले. स्वारी महाराजांची श्रावण शु॥ ९ स शिकरी फत्तेपुरास दाखल झाले. तेथें कांहीं शरीरास बेआरामी जाहली याजमुळें आठ रोज मुक्काम जाहला.

फिरंग्याचीं पलटणें झडत पडत आग्र[illegible] गेलीं. मुख्य[७८] साहेब आग्र्याचे किल्यांत होता. आठ दिवसांची सवड प[illegible] न लेक [illegible]. कानपूरचे छावणींत जाऊन, जमियत करून आग्र्यास आ[illegible]. महाराज फत्तेपुराहून कूच करून मथुरेस आले. तेथें इंग्रेजांकडील सरंमजाम होता तो निघून आग्र्यास गेला. तेथून गणपतराव दिवाण, चिमणाजीपंत भाऊ उभयतां सरमजाम सुद्धां आग्र्याचे सुमारास पुढें रवाना केले. त्याजवर लीक साहेब यांनीं छापा दिल्हा. परंतु हेलपटण्यांत न येतां सांवरून उभे राहिले. हें वर्तमान मथुरेस येतांच खुद्द स्वांशांचें कूच होऊन फा त्या कडे येऊन लढाईचा प्रसंग भाद्रपद वद्य ३० स आरंभ जाला. तेथून पलटणें मथुरेचे मुक्कामास आलीं. फिरंग्याकडील पलटणें चार छापे आले. परंतु प्रथम छाप्यांत महाराजांखालीं घोडे एका मागें तीन पडले. शेवटीं खबुतरासारखा जमिनीवर लुबकला होता परंतु खेत सोडलें नाहीं. मग रघोजी होळकर यानें पुढें येऊन, आपल्या घोड्यावर महाराजांस बसवून जबरदस्तीनें काहाडलें. पुढें छापे आणखीही आले, परंतु यांचे हिशेबांत आले नाहींत. मथुरेचे आलीकडे मुक्काम जाला. पलटणें कूच करून दिल्लीकडे चाललीं. यांनीं पाठलाग केला. मार्गांत लढाई होतच गेली. स्वारी कुतबशाचे कोटानजीक मुक्काम करून सोनपत पानिपतावर मुक्काम केला. पलटणें यमुना उतरून चाललीं. तेव्हां त्यांचे मागें स्वारीचें कूच होऊन शामलीचे गढींत पलटणें गेलीं. तेथें मुक्कामास आश्विन वद्य ११ स गेले. लढाया तेथें ही जाल्या. कार्तिक शुद्ध १ स पलटणें निघून पुढें चालले. तेव्हां स्वारीचें कूच होऊन कोशीस

* सावर=अवसर अवकाश.

७७. आसबाब=आजबाब सामानसुमान.

७८. मुख्य साहेब जनरल लेक.

गेले. तेथें *शमरूची बेगम होती. तिजकडे गुलामीखांस पाठवून तिचें बोलणें जालें मी सामल होतें. तीस हजार रुपये बेगमीनें खर्चास पाठवून आंतून फितूर कीं, पलटणें मागून यावीं. पुढें बेगमीनें आडवें व्हावें. हें समजतांच कही गेली होती याजकरितां महिपतराव रामचंद्र याजला पांच हजार घोडा राऊत सरमजाम सडा मुक्कामावर ठेवून कार्तिक शुद्ध ७ स कूच सरकारानीं केलें. ते मागोमाग पलटणें येऊन दाखल जालीं. महिपतराव रामचंद्र यांची व त्यांची पलटण वाल्यांची गांठ पडली. यांनीं पलटणाशीं पेंढरी काव्यानें लांडगेतोड करून दारू गोळा फिरंग्याचा बराच खराब केला. कही आली ती सांभाळून महाराजांपाशीं येऊन दाखल जाहले. तेथून सोहरभचे सुमारें हासगनावरून आले. पलटणें मद्दू रामपुऱ्याकडे गेलीं. यांनीं हरनाथास कागद लिहून कंपू दिल्लीस रवाना केला. त्यांनीं देल्लीस मोर्चे लावून लढाई सुरू केली. तों दिल्लीस आवई कीं, पलटणें येत . या दबावानें महाराजांची ताकीद आली कीं, बहुत हुशारी [illegible] खटला [illegible] ठून असावें. गाफलीनें गळफटयांत आल्यास कामीं पडणार नाहीं. ही हा [illegible] त रजा जाहल्यावर हरनाथ कोणास न पुसतां मोर्च्यावर पलटणें होतीं तीं जेथील तेथें सोडून कंपूचें कूच करून गेले. ज्यास समजलें तो मुकाटयाच त्याचे मागें गेला. शिलेदार वगैरे मोर्च्याचे मदतीचे लोक तेही राहिले. मागील प्रहर रात्र राहतां सर्वांस समजलें कीं, हरनाथसिंग कूच करून गेला. मोर्च्यांत कंपूचे कारकून जगंनाथ राजाराम व चिमाजी यशवंत व सखाराम सदाशिव होते. यांजला समजतांच विचार पडला. मग शिलेदारांत गमाजी शिंदे व आणखींही चार नांवाचीं माणसें होतीं त्यांजपाशीं गेले. विचार पुढें कसा करावा ? मग गमाजी शिंदे यांनीं विचार केला कीं, हिंमत धरून गोष्ट सांगितली कीं, नक्षा बदनक्षा याचें पुसणें हरनाथ याजला पुसा. तो न पुसतां मोर्चे सोडून गेला तेव्हां आपण राहिल्यावर दिवस उगवतां फिरंग्यास समजल्यावर आंपल्यास वाचूं कशास देतील ? यास्तव मोर्च्यांचे जा ल तेथील तेथें ठेवून तवूर वगैरे कांहीं एक न वाजवितां तोफा काहाडून तुम्हीं कूच करून जावें आम्हीं कंपेंशीं[79] पांच हजार स्वार आहों. दिवस उगल्यावर या शहरचीं माणसें बाहेर निघतील यांची तांब्यातांबोटी[80] करून तुमचे मागोमाग येऊं. अशी सल्ला ठरून, पलटणें तोफा मुकाटयानें काढून, सडा घोडा रावूत राहिला. पलटणें दोन अडीच कोस पोंचले तों सूर्योदय झाला. स्वारांनीं बुणगे मोर्च्यांचे पलटणाबरोबर [ गेले होतेच, हे ] सडे होतेच हुशार होऊन शहराभोंवते अनावळी[81] आरंभिली.

---

* शमरू—ज्यानें पाटणा येथें इंग्रज लोकांची कत्तल उडविली (१७६३) तो असावा.

७९. कंपेश=कमज्यास्त, सुमारें.

८०. तांब्यातांबोटी=लुबाडणें, लूट करणें.

८१. अनावळी=नासधूस, खोडी.

भेट घेऊन, तेथून निघून द्वारकेस[१६] गेले. तेथून मौजे मदगी रणदुल्लाखान यां-च्या जहागिरींतील लुटून कृष्णातीरीं येऊन राहिले. तेव्हां सर्वांनीं विचार करून खवासखान याजकडे विजापुरास जावें. म्हणून तो धारवाडचे नाईकवाडी याजबरोबर नदी उतरून धारवाडास गेले. रणदुल्लाखान यास मुरारपंताचा मोड हो-ऊन पळाले. हें वर्तमान समजतांच आपण फौजेनिशीं भीमा उतरून विजापुरानजीक जाऊन राहिले. खवासखान याणीं विजापूरचे दरवाजे बंद करून लढा-ईचा बेत केला, रणदुल्लाखान याणीं खवासखान यांस निरोप पाठविला जे, शहर-चे दरवाजे उघडावे आणि तुम्हीं सर्व अमिरा प्रमाणें रहावें, तें त्याणीं ऐकिलें नाहीं. तेव्हां अदिलशहा याणीं सिद्धी रेहान यास बोलावून आणून सांगितलें जे, यावेळेस कार्य साधावया पूर्वीं सिद्धी मजकूर व मातुश्री इब्राहिम अदिलशहा यांच्या कारकीर्दींत नौरसपूर येथें विकावयास सौदागरांनीं आणिलें तेव्हां सिद्धी-मजकूर पादशहानीं खरेदी घेऊन आपले पुत्र सुलतान महंमद यास दिला व त्याच्या मातुश्रीस अल्लीखान हजारी याणीं घेतली. त्या पासून शहाजाद्या बरा-बर सिद्धी मजकूर नेहमीं असे. एके दिवशीं शहाजादे याणीं त्याची टोपी हौदांत टाकली तेव्हां तो पादशहाकडे फिर्याद गेला. पादशहा याणीं टोपी काढून देण्यास सांगितलें आणि जवळ होते त्यांस सांगितलें कीं, पादशाही सुलतान महंमद करील तेव्हां हा वजिरी करील. तेव्हां सिद्धी मजकूर यांणीं करीम सर्जे व हुसेनखान या दोघांस हस्तगत करून खवासखान याच्या पारपत्यास तयार होऊन कचेरींत बसले. खवासखान पालखींत बसून घरास निघाला तों करीम सर्जे यांणीं उरावर खंजीर मारला हुसेनखान यांणीं वार मारला असतां खवासखान जखमी होऊन आपल्या घरास गेला. सिद्धी रेहान याणीं पाहिलें कीं, खवासखान जखम सोसून गेला तेव्हां हा वांचला असतां आपल्यास नीट नाहीं. म्हणून पादशहाकडे जाऊन खासगीचे लोक घेऊन जाऊन खवा-सखान याचें घर लुटून पाडून शिरच्छेद केला. हुसेनखान तयार होऊन हत्तीवर बसून खंदकापर्यंत आला. त्यांस सिद्धी मजकूर लोकांसुद्धां जाऊन लोक मारून त्यास मारिला. त्याचा बंधू दाऊदखान पादशहाच्या कृपेंत होता त्यासही मारला. रणदुल्लाखान वगैरे मुत्सद्दी पादशहाच्या आज्ञेनें त्याच रात्रीं येऊन शहापूरच्या हौदावर येऊन उतरले. तेव्हां पादशहानीं खवासखान व मुबरकखान यांचें शीर पाठींत घालून रणदुल्लाखान वगैरे मुत्सद्दी यांजकडे पाठविलें. दुसऱ्या दिवशीं सर्वत्र आल्यावर पादशहा तक्तावर बसून सिद्धी रेहान यास किताब एकलासखान हा देऊन वजिरी दिली. नबाबखान यास

---

१६ या धामधुमींत द्वारकेस जाऊन परत दक्षिणेंत आले हें मोठें नवल आहे.

प्रांतांचा बंदोबस्त सांगितला. अहंमदखान वल्लद खुदावंतखान यास सरनोबती दिली. हिजरी सन १०४५ त खवासखान याणीं वजिरी आठ वर्षे केली.

नंतर कांहीं दिवसांनीं मुस्तफाखान बेळगांवच्या किल्ल्यांत कैदेंत होता त्यास आणावयाकरितां शहाहसन फकरजाबादेस रवाना केले. त्याणीं जाऊन नववे दिवशीं त्यास विजापुरीं पोंहचविलें. त्यास पादशहांनीं सर्फराजी करून ठेविले. मुरारपंत पांच हजार स्वारांनिशीं धारवाडास आले तों किल्लेकरी याणीं किल्ल्यांत घेतलें नाहीं. तेव्हां लढाईस तयार झाले. ते समयीं दलपतराव व सूर्याराव व नाईकवाडी क्रियाप्रमाण घेऊन भेटीस आले. नंतर कैद करून कांहीं लोक मारिले. पण तेथें चार रोज राहूं न दिलें. तों खवासखान यास मारलेली खबर आली. तेथून रात्रीस पळून हरिहरास गेला. तेथील अंमलदार यांणीं कैद करून विजापुरीं पोंहचविला. तेव्हां *रुबरू पादशहास शिवीगाळ केली त्याजमुळें जिव्हाच्छेद करून गाड्यावर बसवून शहरांत फिरवून मारिला. खवासखान यास मारिल्यावरि एक महिन्यानें हें वर्तमान झालें. हिजरी सन १०५७ त मुस्तफाखान यास फौज देऊन कर्नाटकास रवाना केलें. पेशजी शहाजी महाराज व असदखान यास रवाना केले, मागून मलिक रेहान वगैरे सरदार रवाना केले. कृष्णाकिनाऱ्यास युद्ध झालें. शहाजी महाराज याणीं मोड केला. ते समयीं शहाजी महाराजांचा हत्ती आणि सरंजाम लुटून नेहला. मुस्तफाखान याणीं आपल्या लष्करचे बुनगे बंकापुरास पोंहचवून कुमक पाठवावी म्हणून पादशहास पत्र लिहिलें. गाजीखान व मलिक रेहान गंजीकोट घेण्यास रवाना केले. ते तेथें जाऊन वेढा घालून बसले होते. ते समयीं हुकूम आला जे, मुस्तफाखान याच्या कुमकेस जाणें. तेव्हां ते सर्व सोडून तिकडे निघून गेले. तों बंकापुराजवळ नबाब मुस्तफाखान यांची भेट झाली. मुस्तफाखान सर्वांस मेजवानी करून लढाईस निघाले. येलूर येथें लढाई सुरू झाली. मलिक रेहान याणीं आपली फौज एकवेळ शहाजी महाराज असदखान यांच्या फौजेवर पडून मोड करावा असा बेत करून चालून घेतलें. असदखान याच्या घोड्यास जखम लागून घोडा पडला. बावाकरी व खवासहुसेन याणीं कोतवाल घोडा आणिला त्या घोड्यावर बसून निघाले. नबाब मुस्तफाखान लष्कर सुद्धां तळ्याच्या कांठीं उभे राहून तमाशा पहात होते. तेथून मागें सरून मलिक रेहान याचा तमाशा पहावा म्हणून मागें सरून उभे

---

१७. सर्फराजी करणें=मान देणें, सत्कार करणें.

१८. नाईकवाडी=पत्तिनायक, शिबंदीचा मुख्य.

* रुबरु=समक्ष.

राहिले. इतक्यांत मलिक रेहान मोड होऊन पळाले. आल्यावरि नबाब याणीं शाबासकी देऊन आपली तरवार दिली आणि मलिक रेहान यास सांगितलें कीं, तुम्ही शहाजी महाराजांकडील हत्ती लुटून ठेविले ते पादशहाकडे पाठवावे. त्याणीं उत्तर दिलें जे, तुम्हांकडे हत्ती देणार नाहीं. पादशहाकडे आम्ही जाऊं त्या वेळेस हत्ती गुजरूं. हें वर्तमान पादशहास समजल्यावर मुस्तफाखान यास लिहिलें जे, मलिक रेहान याणीं शूरत्वें लढाई केली हें प्रसिद्ध झालें असतां त्याचें चित्त ‡ अजुर्दा करणें हें योग्य नाहीं. जे वेळेस येथें येईल त्या वेळेस हत्ती येतील. असें येतांच मुस्तफाखान चंदीकडे निघून गेले. मलिक रेहान यास कन्या दोन उपवर झाल्यामुळें लग्नें करण्याकरितां मुस्तफाखान याजबराबर गेले. नबाब व शहाजी महाराज यांजमध्यें वैमनस्य येऊन शहाजी महाराज मुखत्यारीनें वागूं लागले. सन मजकूर छ १९ माहे रज्जब रोजीं मुस्तफाखान याणीं मलिक रेहान व बाजीराव घोरपडे व यशवंतराव व असदखान यांस फौज देऊन शहाजी महाराजांस कैद करण्यास रवाना केलें. तों शहाजी महाराज आपल्या डेऱ्यांत रात्रीं राग रंगांत निमग्न होते. तों येऊन वेढा घातला. शहाजी महाराजांस हें वर्तमान कळतांच घोड्यावर बसून जावें तों बाजीराव घोरपडे याणीं येऊन पाय धरिला आणि मुस्तफाखान याजकडे घेऊन गेले महाराजांचे स्वार तीन हजार होते ते पळून गेले. लूट पुष्कळ सांपडली. छ. २६ माहे मजकुरीं खैरीयतखान मेला. मलिक रेहान मुस्तफाखान याचा विश्वास धरीत नव्हता. भेटीस गेले असतां बहुत हुशारीनें रहावें. शहाजी महाराजांस धरल्यावरि आणखी दोन हजार स्वार ठेविले. मुस्तफाखान याणीं सांगून पाठविलें कीं, फौज ठेविण्याचें कारण काय? याणीं सांगून पाठविलें जे, चंदीस वेढा आणि शहाजी महाराज कैदेंत, चहूंकडून गलिम असें आहे. त्यास कोणाकडून कांहीं भय न होईल याजकरितां ठेविलें. नंतर कित्येक दिवसांनीं चंदी घेतली. छ. २६ माहे मोहरम सनै १०६० भोमवारीं तिसरे प्रहरीं सुलतान महंमद अदिलशहा मृत्यु पावले, वय वर्षें ४७ दौलत केली वर्षें ३१.

यास पुत्र अल्ली आदिलशहा सन १०४८ सालीं झाले ते गादीवर बसले. पूर्वीचा वजीर अज्जमखान महंमद यास मारून वजिरी इब्राहिमखान यास दिली. अल्ली अदिलशहा याची मातुश्री बडे साहेब मक्केस निघाली त्याजबराबर वजीर गेले. तेव्हां वजिरी अबदुल महंमद यास दिली. हकीकतखान यास मारण्याची[?] शहाजहा पादशाह नजर बंदींत होते. अवरंगजेब फौज घेऊन दक्षिणेस निघाले. हें वर्तमान अल्ली आदिलशहा याणीं ऐकून खानमहंमद याजबराबर सरदार व

‡ अजुर्दा=खिन्न.　　|　　* इसवी सन १६५०.

फौज देऊन सामोरे रवाना केले. ते जाऊन पोंहचले. एके दिवशीं अवरंगजेब यांची फौज अडचणीच्या जागीं उतरली. तेव्हां खानमहंमद यानीं रस्ता बंद केला. सबब बहुत हैराण होऊन पादशहानीं त्यास चिठ्ठी पाठविली कीं, तुम्हीं आमची मुरवत ठेवून रस्ता सोडला असतां स्नेहांत अंतर करणार नाहीं, आणि दिल्लीचा शहाजादा दक्षिणेस कोणही पहाणार नाहीं. खानमहंमद संध्याकाळीं नमाज करून कांहीं पढत बसले होते तों ही चिठ्ठी आली. तिच्या पाठीवर लिहून पाठविलें कीं, आज रात्रीस निघून जावें. अशी रवाना करून आपल्या मंडळीस सांगितलें कीं, आमचा मृत्यु समीप आला. अवरंगजेब रात्रीस निघून गेले. अफजुलखान बहुत कठोर होता, त्याणीं हें ऐकतांच खानमहंमद याजपाशीं येऊन सांगितलें जे, हा समय आहे तरि जाऊन गांठूं. खान महंमद याणीं उत्तर दिलें कीं, गेला तो गेला जाऊंद्या. अफजुलखान बोलले कीं, कोठें जातो! पाठलाग केला असतां सांपडेल. खानमहंमद याणीं विचारिलें जे, त्यास धरून काय कराल? शहाजादा दिल्लीचा त्यास धरिलें असतां बहुत अरिष्टें होतील. असें सांगून तसेंच ठेविलें. अफजुलखान याणीं विचार केला जे, हें करणें खानमहंमद याचें. तेव्हां क्रोधायमान होऊन विजापुरास जाऊन तरवार पादशहा पुढें ठेवून हा सर्व मजकूर विदीत केला. पादशहा बहुत अजुर्दा होऊन खानमहंमद यास येण्यास पत्र पाठविलें. तेव्हां त्याणीं हलके हलके मुक्काम करून विजापुरास आले. तों मक्केदरवाजाच्या लोकांस हुकूम होतांच येतांच मारिलें. सन १०६७ हिजरींत.

कोंकणप्रांत चेऊल व दाभोळ व वेंगुर्ले व साळसी व को वा वगैरे बंदरें विजापुराकडे होतीं. पूर्वीं दौलत निजामशाही बुडविली तेव्हां प्रांत शहाजहांपादशहाकडे निम्मा व सुलतान महंमद आदिलशाह याजकडे निम्मा वांटून घेतला तेव्हां सारा कोंकणप्रांत विजापुराकडे आला. त्याची मामलत मुल्लामहंमद यास सांगितली आणि त्यांपैकीं दोन महाल पुणें व सुपें शहाजी महाराजांस जहागिरींत दिले होते. तेथें शहाजी महाराज जमेदाराप्रमाणें वतनदारी करून राहिले. सुलतान महंमद यांणीं कर्नाटक प्रांत घेण्यास सर्व सरदार फौज देऊन रवाना केले त्या समयीं शहाजी महाराजही गेले. तिकडे वडील पुत्र संभाजीराजे मृत्यु पावले. शिवाजी महाराज त्या दोन महालची वहिवाट करून पुणें मुक्कामीं रहात होते. पादशहा सुलतान महंमद यास रोग उत्पन्न होऊन अंतकाळ समीप आला. त्याजमुळें प्रांत शत्रूंचा उपद्रव बहुत झाला. सबब मुल्लाअहंमदे यास कोंकणांतून येण्याविषयीं हुकूम जहाला. त्याजवरून तेथून विजापुरीं आले.

---

१९. वर मुल्ला "महमद" असें आहे.

तो प्रांत मोकळा पाहून, शिवाजीराजे यांणीं तजवीज करून, कित्येक मराठे जमवून कित्येक किल्ले घेतले. बाकीचे किल्ले सरंजाम विरहीत होते ते हलके हलके घेतले. इतक्यांत पादशहाचा काळ जहाल्याचें वर्तमान ऐकून बहुत संतोष होऊन कोंकण प्रांत घेतला आणि किल्ले नवे बांधावयास लाविले. पूर्वीं पासून चाळीस किल्यांवर सामान भरलेलें होतें त्यांपैकीं रायरी किल्ला घेतला. तेव्हां त्यांच्या पारिपत्यास अली आदिलशहा याणीं अफजुलखान यास रवाना केलें ते जाऊन लढाई देऊन किल्ले सोडून घेतले. तेव्हां शिवाजी महाराज याणीं विचार करून बोलणें लाविलें कीं, आमचे सर्व अन्याय पादशहाकडून क्षमा जहाल्यास आणि पादशहाची भेट करविली असतां पूर्वीं प्रमाणें चाकरी करूं तेव्हां अफजुलखान याणीं बरें आहे म्हणून सांगितलें. नंतर त्यास मेजवानीस जावली किल्यावर यावें म्हणून सांगून पाठविलें. तेव्हां तो निघोन आला. येतांच त्यास मारिला. सन १०७० हिजरींत.

हें वृत्त पादशहास समजल्यावर बहुत क्रोधायमान होऊन कोणास पाठवावें या विचारांत होते तों सिद्धी जवाहर कर्नुळास बंड करून होते. त्यांची अर्जी आली जे, सर्व अन्याय क्षमा करून अभय जहाल्यास सेवेशीं येऊन हजर होईन. पादशहांनीं उत्तर लिहिलें कीं, तुम्ही म्हणतां तें कबूल तरि जलद येऊन पोंचावें. त्यावरून सिद्धी मजकूर आले. त्याची सरफराजी करून किताब सलाबतखान देऊन शिवाजी महाराज यांच्या पारिपत्यास रवाना केलें. नंतर येऊन लढाई देऊन कित्येक किल्ले घेतले. शिवाजीराजे पन्हाळ्यास येऊन राहिले. सिद्धी मजकूर किल्यास वेढा घालून बसले तों महाराज यांणीं स्नेहाचें बोलणें लावून आपल्या आधीन केला. हें वर्तमान पादशहास समजतांच खुद्द पादशहा निघाले ते मिरजेस येऊन पोंहचले. हें वर्तमान शिवाजी यास कळतांच निघोन गेले. सिद्धि मजकूर करनुळाकडे गेले किल्ला पादशहाच्या स्वाधीन जहाला. सन १०७० हिजरी.

नंतर पादशहा विजापुरास निघोन गेले. सिद्धी जवाहर पन्हाळ्याहून निघाला तो प्रांत लुटीत खंडणी घेत चालला. त्याच्या पारिपत्यास खुद्द पादशहा फौज घेऊन निघून कृष्णेच्या तटाकीं राहिले. तों खबर आली कीं, सिद्धी याकुत हवालदार तोरगळकर यांणीं बंड केलें तेव्हां तिकडे जाऊन त्याचें पारपत्य करून रायचुरास गेले. सिद्धी जवाहर लढाईस तयार होऊन आले. अबदुल महमंद वजीर जाऊन युद्ध होऊं लागलें. सिद्धी मजकूर याची फौज सिकस्त[२०] होऊन रायचुरास गेले. तेथें एक रात्र राहून दुसऱ्या दिवशीं तुंग-

२०. सिकस्त=पराभूत.



अनुक्रमणिका

भद्रा उतरून करनुळाकडे गेले. पादशहा यशस्वी होऊन रायचुरास गेले. तेथें किल्लेदार सिद्धी मजकूर याजकडील होता त्याणें विचार करून किल्या पादशहापाशीं आणून दिल्या, आणि कृपा संपादून घेतली. नंतर पादशहा किल्यांत गेल्यावर मुसलखान व जबरदस्त यांस हुकूम जहाला कीं, फौज घेऊन जाऊन परंडे किल्याच्या सुमारें राहून सिद्धी मजकुराकडून उपद्रव जहाला असतां पारपत्य करावें. सरदार मजकूर हुकुमाप्रमाणें तुंगभद्रा उतरून राहिले. ती फौज आली या करितां सिद्धी मजकूर फार क्रोधायमान होऊन सिद्धी मसाऊद याजबराबर फौज देऊन रवाना केला. तो आल्यावर उभय लष्करचें युद्ध होऊन सिद्धी मजकूर याचा मोड होऊन करनुळाकडे पळून गेला. हें वर्तमान सिद्धी जवाहर ऐकून फार खिन्न जहाला. त्यास पूर्वीं रोग लागला होता आणि हें दुःख झालें यास्तव बहुतच रोगानें ग्रासून त्यांतच मरण पावला. नंतर त्याचा पुत्र अबदुल अजीज व सिद्धी मसाऊद याणीं अबदुल महंमद वजीर यांचा स्नेह केला. त्याणीं पादशहास सांगून सर्फराज करून चाकरीस ठेविलें.

हिजरी सन १०७३ यांत भद्राप्पा नाईक राजे जमीदार मुलनार सुभे बिदनूर याणीं बंडाई करून पादशही मुलूक घेतला. सबब खुद्द पादशहा तयार झाले आणि पुढें त्याच्या पारपत्यास सय्यद इलपास यास सर्जेखान हा किताब देऊन फौजेसह रवाना केलें. मागाहून आपणही गेले. सर्जेखान तेथें जाऊन लढाई देऊन कित्येक किल्ले परत घेतले. पादशहाही बंकापुरास येऊन पोंहोचले. हें ऐकून बहुत संतोष होऊन युद्ध करूं लागले. कर्नाटक प्रांत घेण्यास अबदुल रहीम बहलूलखान यास पाठविलें होतें त्यास हुजूर येणें म्हणून आज्ञापत्र पाठविलें. त्याजवरून ते आले. त्याची सर्फराजी करून सेनेसहीत सर्जेखान याजकडे निघाले. सर्जेखान बिदनुरीं लढत होते तेथें जाऊन फौज मिळाली. भद्राप्पा नाईक धीर सोडून बिदनुरांतून कोलीदुर्गास गेले. बिदनूर घेऊन पादशहा कोलीदुर्गाकडे निघाले. इतक्यांत बहलूलखान याच्या विद्यमानें बोलणें केलें जें, दरसाल खंडणी देऊन राहूं. तें पादशहांनीं कबूल करून पूर्ववत् प्रमाणें रहाण्यास हुकूम दिला. ते समयीं भद्राप्पा नाईक याणीं नजराणा बहुत दिला. पादशहा निघून विजापुरास आले. नंतर मुल्ला अहंमद यास कर्नाटक प्रांतीं रवाना केलें. त्यावर तिकडे जाऊन चंदावर घेतलें. आणि बाकीचे किल्लेही घेतले.

इकडे अलमगीर याणीं जयसिंगराजे शिवाजी महाराज यांच्या पारपत्यास दक्षिणेस रवाना केलें. त्यांणीं विजापूर प्रांतास उपद्रव केला. सबब अदिलशहा यांणीं मोठमोठे सरदार सल्लाह अलमगीर व आपल्यामध्यें असावा म्हणून

रवाना केले. परंतु त्यांणीं कांहीं ऐकिलें नाहीं. तेव्हां अदिलशाहा यांणीं अबदुल महंमद याजबराबर फौज देऊन रवाना केलें. तों खबर आली कीं, जयसिंगाकडील सरफराज याणीं पांच सहा हजार फौज घेऊन जाऊन मंगळवेढ्याचें ठाणें घेतलें. त्या वेळेस सर्जेखान मंगळवेढ्यास जलद जाऊन लढाई दिली, सर्जेखान याची फत्ते जहाली. सर्फराज निघून गेले आणि सर्जेखान पादशहाच्या फौजेंत दाखल जहाले. अबदुल महंमद वजीर व पोलादखान व अजीजखान व गालीबखान व दियानतराव वगैरे तयार होऊन दक्षिणेंतील फौजेची व हिंदुस्थानच्या फौजेची कित्येक दिवस लढाई होत होती. इतक्यांत हैदराबादवाले कुतुबशहाचें पत्र अलीअदिलेशहास आलें जे, कुमकेची जरूर असल्यास पाठवितों. यांणीं फार उत्तम आहे म्हणून उत्तर पाठविलें. त्याजवरून कोणी नेकनामखान याजबरावर फौज देऊन पाठविलें तेही येऊन पावले. तों एके दिवशीं वर्तमान आलें कीं, अलमगीर याजकडून सलाबतखान जयसिंगाकडें येत आहे. त्याजवरून सर्जेखान फौजेनिशीं त्याचे तोंडावर जाऊन लढाई दिली. फत्ते सर्जेखान याची झाली. हैदराबादकर यांची व अलीशहा यांची फौज एकंदर लढती तेव्हां परिणाम नीट नाहीं, म्हणून जयसिंग दिल्लीस निघून गेले. पादशाह विजापुरास आले.

नंतर अली अदिलशहा नेहमीं ऐषआरामांत नाटकशाळेच्या[२१] संगतीस घालवूं लागले. छ. ४ रबिलावल रोजीं मुजफरखान बिदनुराहून आले त्यास सामोरें पादशहाची स्वारी जावी म्हणून निघाले तों रस्त्यांत वारा लागून प्रकृति बिघडल्यामुळें परत येऊन दाखल झाली. नंतर तिसऱ्या प्रहरीं बेशुद्ध झाले. एक दिवस एक रात्र तसेच होते. दुसरे दिवशीं कांहीं शुद्धि आली, परंतु अर्धे आंग गेलें. हें पाहण्यास अबदुल महंमद व खवासखान आले, पाहून परत गेले. मिरजा युसफबेगखान व धर्माजीपंत डबीर बादशहा जवळ राहून दरवाजा बंद करून येणें जाणें दिंडींतून यावें असें केलें आणि औषध उपाय हकीम शमशुद्दीखान याजकडून करवीत, परंतु शुद्ध पूर्ववत प्रमाणें [ न ] आली आणि रोग दिवसें दिवस वृद्धिगत जहाला. दौलतीचें काम अबदुल महंमद वजीर करीत होते. एक दोन दिवस पादशहाच्या समाचारास गेले. खवासखान चहूं दिवसांनीं येऊन हुजरे यांस बोलावून नेत. पादशहाकडे वजीर याचें जाणें येणें होतें त्या प्रमाणेंच दियानतराव जात येत होते, परंतु दौलतीच्या कामांत खलेलें[२२] जहाली नाहीं. दियानतराव सर्वकाळ अबदुल महंमद याचें कोणत्या वेळेस काय होईल या विवंचनेंत राहिले. युसफबेगखान खवासखान याच्या तर्फेनें वागूं

२१. नाटकशाळा=कंचनी, वेश्या. | २२. खलेल=अडथळा.

लागले. अबदुल महंमद वजीर व दियानतराव यांचा व धर्माजी पंत डबीर यांचा द्वेष पडून धर्माजीपंत मुजफरखान याच्या विचारें वागूं लागले. पादशहा याणीं विचार केला जे, खवासखान व मुजफरखान यांस वजिरी करण्याचें सामर्थ्य नाहीं आणि अबदुल महंमद याणीं दहा बारा वर्षे वजिरी करून माहितगार व कार्यकर्ते आहेत व शिवाजी महाराज व बहलूलखान राजी आहेत तरि त्यांस आणून, शाहजादा शिकंदर यास हवाली करून, त्यास आपल्या समक्ष तक्तावर बसवून त्याणीं कारभार करावा. त्याजवरून अबदुल महंमद यांस बोलावून आणून या प्रमाणें सांगितलें. नंतर त्याणीं कबूल केलें नाहीं. तेव्हां आपल्या मागें दौलतीची व्यवस्था कशी होईल ? अलमगीर पादशहा व शिवाजी महाराज हे उभयतां वाट पहात बसले आहेत. त्यास हेंच उत्तम. तुम्हीं शिकंदर पादशहास तक्तावर बसवून प्रांताचा बंदोबस्त तुम्हीं करावा. त्याणीं उत्तर दिलें कीं, माझ्यानें हें काम होत नाहीं. या कामास खवासखान योग्य आणि त्याचा बाप या कामांत मेले आहेत. त्याजवरून पादशहा अजुर्दा होऊन बसले जे, आपल्या मध्यें सामर्थ्य राहिलें नाहीं. त्यास दियानतराव वगैरे याणीं अबदुल महंमद यास सांगितलें. परंतु त्याणीं मान्य केलें नाहीं. आणि बोलिलें कीं, खवासखान याणीं शहाजादे यास तक्तावर बसवून आपण वजिरी करावी आणि आम्हास किल्ले शहादुर्ग व सगर व गुलबुर्गे देऊन मोगलाई तोंडावर ठेवावें. बहलूलखान याजकडे मिरज आहेच आणि पन्हाळ देऊन शिवाजी राजे यांच्या तोंडावर ठेवावें, आणि मुजफरखाम यास बिदनुरी ठेवावें. त्याजवरून खवासखान बहुत खुषी होऊन अबदुल महंमद व खवासखान यांचें क्रियाप्रमाण जहालें जे, पादशहा मृत्यु पावल्यावर दुसरे दिवशीं या प्रमाणें करावें. पादशहास रोगानें बहुत हैराण केलें ते समयीं दियानतराव खवासखानाकडे मिळाले. धर्माजीपंत डबीर मुजफरखान यांजकडे मिळाले. परंतु अबदुल महंमद व दियानतराव याणीं मुजफरखानाचें कांहीं चालूं दिलें नाहीं. पादशहास सांगून बिदनुरास रवाना केलें. नंतर धर्माजीपंत याणीं पादशहास सांगून परत मुजफरखानास आणविलें. त्याणीं फौज यादवाडांत ठेवून एकरात्रींत येऊन पावले. आणि सर्वकाळ पादशहाच्या सन्निध राहून खवासखान याची येण्याची परवानगी बंद केली, आणि सांगितलें जे, तुम्हांस येणें असल्यास एकटे यावें. या मुळें याचें व त्याचें वैमनस्य पडलें. मीरजा युसफबेगखान पादशहास रोग उत्पन्न जहाल्यापासून शेवट पर्यंत एक क्षणभर सोडून गेले नाहींत आणि खवासखान याची तर्फदारी करीत होते. पादशहास मृत्यूच्या पूर्वी पंधरा दिवस भ्रम पडला होता. युसफखान याणीं सर्व कारभार खवासखान याच्या स्वाधीन केला त्याणीं पादशहाचा अंतकाळ

# अनेक कविकृत कविता

## भाग ३ रा.

## श्यामाकविकृत स्यमन्तकोपाख्यान.

आहे अद्वय पूर्ण तत्त्व न दिसे मायेचिया आरिसा ।
लीलावेश धरी प्रवेश विवरीं केला दमाया रिसा ॥
दावी कौतुक जो स्यमंतक हरी श्रीजांबुवंती हरी
तत्पादांबुज-वंदनीं रत मना ग्रंथक्रिया यावरी ॥ १ ॥
जे लीला अभिमन्युजा शुक वदे पारीक्षितातें मुनी ।
वैशंपायन जांबुवंतिवरणा ते दृश्य भाषा जनीं ॥
नाशी हंकृति ऋक्षराज-मानिंची श्रीसत्यभामा हरी ॥
ऐकावी सुमनें स्यमंतक-कथा जे पातकें संहरी ॥ २ ॥
पूर्वीं मारोनी रामें रजनिचरें-पती फोडिली बंदिशाळा ।
भद्रीं लंकेशबंधू करुनि चिरंजिवी आणिली भूमिबाळा ।
देवां इंद्रादि सर्वां सह कपि रिस ही बैसलासे विमानीं ।
आला तो राजधानीनिकट उतरला विश्व आनंद मानीं ॥ ३ ॥.
वामांगीं विलसे सुकांचनलता श्रीजानकी सुंदरी ।
श्रीगंगेहुनि शुभ्र चामर वसे शेषावतारांकरीं ॥
अग्रीं वायुसुतें विनीतसुचितें संभाविजे शासना ।
त्या श्रीरामपदांबुजीं रत मना अन्यत्र निर्वासना ॥ ४ ॥
भेटोनि बंधु भरता मग राजधानी । केला प्रवेश सुखसिंधु सिमा न मानी ॥
राज्याभिषेक विधिपूर्वक सर्व झाला । आज्ञा करी नृप कपीरिस-राक्षसांला ॥ ५ ॥
दे उचीत सकळांप्रति राजा । भावपूर्वक म्हणे सदनां जा ॥
स्नेहपूर्ण हृदयांत असावा । हेतु सार्थक पदीं च वसावा ॥ ६ ॥
तेव्हां ऋक्षपती करीत विनती अग्रें उभा राहिला ।
यावत्काळ बहुत संगर मही स्वर्गीं हि म्यां पाहिला ॥
महोर्दंडें प्रचंड कंडु सहसा अद्यापि गेला नसे ।
बा रे तों वर दे स्वदर्शन दिजे मत्प्रार्थना हे असे ॥ ७ ॥
ऐकोनियां वदत दाशरथी तयाला । जो इच्छिसी तव मनोरथ पूर्ण झाला ॥
आतां मनीं समज पूर्ण तुझी अपेक्षा । द्वापार अंत-समयीं करिजे प्रतीक्षा ॥ ८ ॥

---

१ ऋक्ष=आस्वल. ( ऋक्षराज=जांबवान् ) २ रजनिचरपति=राक्षसराजा रावण.
३ शेषावतार=लक्ष्मण. ४ संगर=लढाई. ५ दोर्दंड=बाहुदंड. ६ प्रतीक्षा=वाट पहाणें.

त्या नंतरे त्वरित वंदुनि पाद-पद्मा । सिंधूतिरीं रिसपती अजि ये स्व-सद्मा ॥
भूवीवरीं निजगृहीं मग शीघ्र आला ॥ राहे सुखें चि तंव काळ कितेक गेला ॥९
भावें भजे अनुदिनीं मनिं त्या अजाला । दैवी-कृपेकरुनि संतति-लाभ झाला ॥
कन्या तया परम सुंदर एक झाली । कौशल्यता च विधिची स्वरुपासि आली॥१०॥
तो पूर्ण ब्रह्म अवतार धरी हरी तो । नामें करुनि कलिकल्मष संहरीतो ॥
मा चंचळा परि कदापि जया चळेना। शेषादिकां स्तवनलेश हि आकळेना॥११॥
क्षीरांबुधींत उरगेंद्र करोनि माचा । राहे निजोनि सुख-सिंधु पराक्रमाचा ॥
कंसादिकीं बहुत पृथ्विस त्रास केला। ब्रह्मा स्तवी पय-निधी-तिरिं त्या अजाला॥१२॥
देव-स्तवें करुनि तोष विशेष झाला ।माया-विलास नटणें मग त्या अजाला ॥
जे जे क्रिया सकल ही करि त्या न केली। पूर्णावतार-चरिता मति हे भुकेली ॥१३॥

बाळ क्रीडा-समाजीं खळ बळि वधिले कंसविध्वंस केला ।
भक्तोद्धार प्रतापें करुनि वर-पदीं उग्रे ही स्थापियेला ॥
आणी शौर्यक्रमानें भिम-कुल-ललना लोक-लीला नुपेक्षी ॥
लोकीं लौकीक रक्षी परम पुरुष तो सर्व-संसार-साक्षी॥ १४ ॥
सत्राजीत म्हणोनि राजसुकुळीं होता गृहस्थाश्रमी ।
तेणें सूर्यप्रसन्नता तपवशें ते साधिली स्वाश्रमीं ॥
होतां अब्द पुरें स्यमंतकमणी दे तोषुनी दिन्मणी ।
तो नित्य प्रसवे सुवर्ण वजनी भारांष्ट तेजोगुणी ॥ १५ ॥
देतां त्यासि मणी वदे दिनमणी यत्नें यया रक्षिजे ।
त्वद्देहीं अशुचित्व प्राप्तसमयीं आनर्थता पाविजे ॥
केला आक्षेप सज्जनीं म्हणाति तो भारिक जाणों कसा ।
लेखा लेखक वित्पती च परिसा लीलावतीचा असा ॥ १६ ॥
साडेचौतिस या मणांवरि निकें शेराष्टका लेखिजे ।
तोळे एकविसांवरी अधिक ते चत्वारि मासे दिजे ॥
संख्या भार सुवर्ण एक चि असा जो नित्य अष्टावधी ।
भारांतें प्रसवे सुवर्णमणि तो प्रत्यक्ष तेजोनिधी ॥ १७ ॥
दे तो नित्य सुवर्णदान नगरीं शोभे विना याचकीं ।
विस्तारे अति कीर्त्ति लोक वदती वार्त्ताविना याच कीं ॥
प्रादेशीक अनेक विप्र तरले दारिद्र्य-सिंधू-पुरा ।
झाले लोक अशोक दुःख न उरे रक्षा जशी कर्पुरा ॥ १८ ॥

---

७ सिंधु=समुद्र * सद्म=घर. ८ उरगेंद्र=शेषसर्प. ९ उग्र=उग्रसेन राजा. १० भार=३४½मण, ८ शेर, २१ तोळे, ४ मासे असें पुढ १७ वे श्लोकांत आहे.

ऐशी ही लोक वाणी परिसत श्रवणीं कृष्ण बोले तयासी ।
केंचे हें हेम देशी अगणित विबुधां आणिकां याचकांसी ॥
तो बोले यादवेंद्रा [११]तरणि मज मणी दीधला भक्ति-योगें ।
तो देतो फार सोनें प्रतिदिनिं मग मीं दान देतों प्रयोगें ॥ १९ ॥
बोले हरी स्वहितअर्थ मनांत ध्यावा । होतो मणी तुज न योग्य नृपासि द्यावा ।
हा नीधि थारत नसे लघु आश्रमातें । जातां हि जे परम पावति ते श्रमातें ॥२०॥
[१२]मृगमदें चि मरे मृग कर्दळी । निपजतां तिस कर्पुर निर्दळी ।
फणि मणिस्तव गो निजचामरें । मिरवि भूषण वास्तव तो मरे ॥ २१ ॥
सांगे हरी स्वहित तें न मने च त्यातें । आरंभिलें अनहिता स्वक्रिया स्व हातें ॥
कंठीं प्रसेनअनुजा मणि बांधिलासे । जाणों दुजा दिनमणी च तसा प्रकाशे ॥२२॥
कोणेके काळवेळीं विपरित समयीं त्या प्रसेनें विहाळीं ।
केलें प्रस्थान झाली रजनितमवशें सर्व सेना निराळी ॥
एका अश्वोत्तमेंशीं भ्रमण करितसे [१३]सुप्ति नेत्रांसि आली ।
होणारा कोण टाळी अवचित विपिनीं [१४]केसरी गांठि घाली ॥ २३ ॥
मारी अश्वोत्तमाला वधुनि नर मणी शीघ्र घेऊनि गेला ।
त्या काळीं ऋक्षराजा विहरण करितां त्या वनामाजि आला ॥
पाहे तों दीप्ति मोठी नवल मग करी काय आला [१५]तमारी ।
शोधी [१६]ब्रह्मावतारी चपळ पद [१७]हरी देखताहे पुढारीं ॥ २४ ॥
मारी दोर्दंड कोपें वधुनि मग मणी घेतला तो प्रतापें ।
आलासे स्वाश्रमातें कुमरि म्हणतसे आणिलें काय बापें ॥
घाली कंठीं मणी तो उरत न विवरीं अंधकारासि थारा ॥
ऐकावें सावधानें म्हणत मुनिपुढें द्वारकेच्या विचारा ॥ २५ ॥
गेला प्रसेन म्हणती जन काय झाला । मागे हरी मणि न दे चि फळासि आला ॥
इच्छी समर्थ तरि सर्व हि शीघ्र यावें । दूराग्रहें सहित अर्थ जिवें चि जावें ॥ २६ ॥
लोकीं लौकीक ऐसा परिहरण करी कृष्ण शोधा निघाला ।
संगें घेऊनि सेना फिरत गिरिगुहा त्या वनामाजि आला ॥
पाहे तों वीर वाजी महिवरि पडले माग लागे हरीचा ।
त्यातें ही मृत्यु झाला रिसकरनिकरें लाविती लाग त्याचा ॥ २७ ॥
पुढें जातां जातां विवर नयनीं देखत [१८]हरी ।
[१९]हरी हा सद्रत्ना म्हणुनि वदती ते परिहरी ॥

११ तरणि=सूर्य. १२ मृगमद=कस्तुरी. १३ सुप्ति=झोंप. १४ केसरी=सिंह. १५ तमारी=सूर्य. १६ ब्रह्मावतारी=जांबवान्. १७ हरी=सिंह. १८ हरी=कृष्ण. १९ हरी=नेई.

[२०]हरीतें मारोनी करि कवण हे क्रूर करणी ।
रणीं त्याचे रक्तें करिन म्हणतो रक्त धरणी ॥ २८ ॥
ठेविले सकळ सैनिक मागें । हे कथा नृपवरा मुनि सांगे ॥
जातसे विवरिं एकट राया । जो उदीत खळदंड कराया ॥ २९ ॥
बोले मुनी सकळ सैनिक वीर द्वारीं । ठेवूनियां प्रविशला विवरीं मुरारी ॥
कैसा म्हणाल तरि तो विबुधावतारी । नव्हे चि त्यांत परि एक चि धैर्य धारी ।३०।
ते बोलती परम काळ कठीण आला । झाला अनर्थ तरि काय विवेक याला ॥
राहोनियां उपरि सार्थक होत नाहीं । द्वारावतीविण विचार न अन्य कांहीं ॥३१॥
सेना द्वादश दीन सर्व विवर-द्वारावरी राहिली ।
येतां मार्ग न देखती च हरीचा चिंतार्णवीं वाहिली ॥
प्रेतें प्राणविना स्वयें न चलती ज्यांतें नसे तारता ।
मध्यें [२१]स्यंदन चालवीत असती श्रीकृष्णजीचा रिता ॥ ३२ ॥
येतां देखति लोक ते नगरिचे शोभा नसे [२२]वाहिनी ।
साक्षेपें जंव पाहतां न दिसते श्रीमूर्ति [२३]आब्वाहिनी ॥
कृष्णावीण रयोत्तमा निरखितां तो काळ भासे कसा ।
कोणा कोणि न शांतवी प्रळय हा सर्वां शिरीं कीं तसा ॥३३॥
दुःखांबुपूर अति अद्भुत तेथ आला । शोकांबुधींत अवघा जन मग्न झाला ॥
इत्यादि राम पुसताति वृतांत सारे । सांगा त्वरें वदति दृश्य पदार्थ सारे ॥ ३४ ॥
जातां देखों प्रसेना मरण अवचटें केसरीचेनि हातें ।
होतां तेथूनि अग्रे [२४]निधन रिसकरें देखिलें त्या हरीतें ॥
त्याचा ही शोध घेतां विवर मग पुढे एक तें थोर भारी ।
आम्हां ठेवूनि द्वारीं न धरि भय शिरे एकटा कैटभारी ॥ ३५ ॥
आम्ही द्वादश दीन सर्व विवर-द्वारावरी राहतां ।
कांहीं एक उपाय तेथ न चले सर्वांमतें पाहतां ॥
आलों वृत्त निवेदनार्थ इतुकें हें ऐकतां त्या मुखें ।
हाहाकार च वर्तला जनपदीं गेलीं गळालीं सुखें ॥ ३६ ॥
गडबडां धरणीवरि लोळती । वदनिं खेदक शब्द हि बोलती ॥
हरिविना सुख तें कवणा असे । सकळ अंडकटाह रिता दिसे ॥ ३७ ॥
पिता बोले कृष्णा न पुरवुनि तृष्णा मज कसा ।
वियोगाब्धीमध्यें बुडत पहसी शोकवळसा ॥

---

२० हरीतें=सिंहाला. २१ स्यंदन=रथ. २२ वाहिनी=सेना. २३ आब्वाहिनी=मेघसदृश. २४ निधन=मरण.

अनेकां जन्मांचे सुकृतफल देऊनि हरिलें ।
मुखीं कृष्णा कृष्णा म्हणत तंव मूर्च्छेनं वरिलें ॥ ३८ ॥
वियोगें पुत्राच्या जगजनकमाता तळमळी ।
करें ताडी वक्त्रा जळ गळतसें नेत्रकमळीं ॥
अरे रे गोविंदा वदन नयनीं दाखवि हरी ।
न कंठे रे बाळा तुजविण मला देहकुहरीं ॥ ३९ ॥
विराली सर्वांगीं भिमक-तनया चिद्रुपकळा ।
अलंकारां त्यागी नयनिं जळ वक्त्रेंदु विकळा ॥
भुमी लोळे हातें उरशिरमुखा ताडण करी ।
किती सांगावी ते लहरिवरि दुःखाब्धिलहरी ॥ ४० ॥
तों संत भक्त हरिचे परमाप्त आले । जे कां चतुष्टयगती हरितें मिळाले
ते बोलती चतुर हो वचनावधारा । नेणा हरीचरित शोक वृथा उभारा ॥ ४१ ॥
बोले उद्धव भक्तराज सकळां कां आदरा शोक हा ।
बालत्वादि चरित्र चित्र हरिचें अद्यापि [ तुम्ही ] पहा ॥
दुष्टां दंड उदंड दैत्य वधिले कंसादिकां ही असा ।
काळाचा हि विशाळ काल हरि जो त्या मृत्यु माना कसा ॥ ४२ ॥
दिसे शोभा सर्वीं अमळ दिसती या दश दिशा ।
न कांहीं दुश्चिन्हें हृदयकमळीं साक्षि ही अशा ॥
वदों हे सद्वाणी धरुनि असणें निश्चय मनीं ।
न जावें कोणीं ही चतुर नर हो शोक-भुवनीं ॥ ४३ ॥
ऐकतां नगर-शोक-पसारा । पूशिलें विवर गूढ विचारा ॥
आयकें मुनि म्हणे कुरुराया । तो शिरे विवरिं गर्व हराया ॥ ४४ ॥
सकल समुह--पंक्ती देखिली अंगनांची । अवचित तंव पाहे मूर्ति सर्वोत्तमाची ॥
जवळि कुमरि पाहे तो मणी कंठ-देशीं । हरुनि मग हरीनें घेतला सत्वरेशीं ॥ ४५ ॥
देखतां चि हरितें रिसदारा । बोलती अजि किमर्थ उदारा ॥
जाहलासि पतिचा अपराधी । कूर वीर सगुणा तुज बाधी ॥ ४६ ॥
कोपी उग्र पराक्रमी रिसपती त्याच्या बळाची सिमा ।
ब्रह्मा इंद्र कृतांत रावण-रिपू ते जाणती विक्रमा ॥
या लागीं अरविंद-सुंदर-दशा कारुण्य वाटे मना ।
जावें देउनि रत्न सत्वर घरा चित्ताचिया मोहना ॥ ४७ ॥
देखतां चि नयनीं छळशी रे । सुंदरा मग कसा पळशी रे ॥

---

३५ अरविंद=कमल.

वाटसी जिव जसा गुणरत्ना । सांगतों तव हितास्तव यत्ना ॥ ४८ ॥
बोले गर्जोनि वाचा त्रिभुवनपति तो सिंधु जो कीं बळांचा ।
जा जा तो देखवा जा न गणि विर दुजा गर्व नासूं खळाचा ॥
तुम्हीं जाना च जाया धरुनि जरि भया ऋक्ष तो जागवाया ।
गर्वाच्या पर्वताची महिवरि निकरें ताडितों दीर्घ काया ॥ ४९ ॥
हें कठोर घन गर्जन कानीं । ऐकतां च उठला दचकोनी ।
देखतां नयनिं मानव ऐसा । कोपला वनिं हुताशन तैसा ॥ ५० ॥
आरक्त नेत्र वदनीं विकराळ दाढा । क्रोधें करी दशैंन शब्द मुखें कडाडां ॥
रोमीं उभीं कडकडी भुजकाळदंडा । ज्या विक्रमें गलितवीर्य विरप्रचंडा ॥५१॥
विष्णु तो त्रिजगनायक साचा । वर्णवे न पुरुषार्थ तयाचा ॥
सृष्टि-लेख करि फार विधीचे । कीं अगाधपण अंबुनिधीचें ॥ ५२ ॥
दोघे वीररसांबुधी डहुळले एकाकि ठेले बळें ।
हस्तें हस्त पदें पदा विदळती मल्ल क्रमें आगळे ॥
देती ते धडका चपेट कडका शब्दोद्भवे गर्जना ।
नाना युक्ति परस्परें उरशिरीं कोपाद्भुतें मज्जना ॥ ५३ ॥
अठ्ठावीस दिनावधीं दरिगुहाअभ्यंतरीं भीडती ।
एका एक ढळे चि ना किमपि ही नादें दणाणे क्षिती ॥
देवें युक्ति विचारिली निज मनीं त्रैलोक्यभारा तळीं ।
झाला बा न वधासि योग्य म्हणुनि भक्ताग्रणी हा बळी ॥ ५४ ॥
आणिला सबळ भूमि अहो तो । विस्मयें चकित अद्भुत होतो ॥
वीरसागर बळें तरलों कीं । मत्समान नवता सुरलोकीं ॥ ५५ ॥
अशा या पस्ताई पडत तंव चित्तांत विवरी ।
म्हणे आज्ञा घेतां रघुपतिमतें गौरव करी ॥
करीं मी विज्ञप्ती प्रबळबळ योद्धा मज असा ।
घडावी त्वद्भेटी वर वरद मानूं भरंवसा ॥ ५६ ॥
अस्तू म्हणोनि नृप भास्कर-वंशरत्नें । हें पावसी पुढति जाण विना प्रयत्नें ॥
द्वापार-अंत-समयीं वरदान साचें । देईन दर्शन तुतें पद-सारसाचें ॥ ५७ ॥
ऐशी वृत्ति विरे उपाधि विसरे तो क्रोध ही वोसरे ।
चित्तीं प्रेम भरे विरत्व उतरे संसारमाया सरे ॥
कंदर्पादि नुरे अहंकृति सरे सर्वांग ही पाझरे ।

---

२६ दशन=दांत. २७. रोम=केश.

अनुक्रमणिका

माघारें नयनांबुजीं निरखितां श्रीराम देखे त्वरें ॥ ५८ ॥
वज्रादिलक्षणसुलक्षण पादपद्मे । योगीशमानसे[28]मधुव्रतसेव्य सद्मे ॥
शापाभिमोचन पहा सतिगौतमाचें । ते देखिले चरण त्या पुरुषोत्तमाचे॥५९॥
रक्षोगणांसि भय देत कठोर साचें । देतां निजां वरद ओघ सुधारसाचे ॥
सीताकरग्रहण मंगल मंगळाचें । ते देखिले कर तया शुभमंगळाचे ॥ ६० ॥
केले स्वभक्त भजनें निजरूप सारे । इच्छावशें च पसरी अवघे पसारे ॥
त्याचे सुखासि मुख कोण जगीं निवेदी । नेणों म्हणोन धरिलें दृढ मौन वेदीं ६१
हें देखतां वदन सद्गद ऋक्ष झाला । अष्टध्वज विमल सात्विकभाव आला ॥
सत्वादि शांति मग आदरिलें स्तवातें । वर्णी यथास्वमति राघववैभवातें ॥ ६२ ॥
श्रीसूर्यवंशवर राघव रामराया । श्रीवत्स निस्पृहजनांत खरें कराया ॥
तूं पूर्णकाम सुखधाम कृपैकसिंधू । केली दया मणिमिसें मज दीनबंधू ॥ ६३ ॥
स्वामी रूपें ज्या मज तोषवीलें । तें रूप पाहूं मनिं इच्छियेलें ॥
ऐकूनियां राम उदार-मूर्ती । झाला तयीं कृष्ण विशालकीर्ती ॥ ६४ ॥
कोपशील जरि तूं लघु भृंगी । जों न होय पळ तों मज भंगी ॥
मानिसी स्वपदरेणु रिसातें । मर्दिलें मज तुवां निज हातें ॥ ६५ ॥
असे आतां माझी विनति चरणीं एक परिसा ॥
न कांहीं आशंका तव पदरजें सार्थक रिसा ॥
कितेका काळांची विरूढलि गृहीं संततिलता ।
गमे हे अर्पावी तव चरणसेवेसि दुहिता ॥ ६६ ॥
त्वां जिंकिला मणि सुचंडपराक्रमानें । ईचें करीं ग्रहण या च अनुक्रमानें ॥
कीजे म्हणे हरि नुपेक्षित तो स्वदासा । अर्पी सुता मणिसहीत जगन्निवासा॥६७॥
तों ऐशा सुदिनीं प्रबंध वदनीं डोले हरीकीर्तनीं ।
स्कंधीं ब्रह्मविणा कथी हरिगुणा तत्काळ आला मुनी ॥
बोले ऋक्ष समस्त पुण्य फळलें उद्धार केला दिना ।
श्रीकृष्णें हि विनीतता मुनिचिया केलें पदीं वंदना ॥ ६८ ॥
केली पुजा विधिपुरःसर नारदाची । ऋक्षें सुकीर्त्ति कथिली भवपारदाची ॥
गंधर्वलग्न विधिपूर्वक लाविलेंसे । आश्चर्य हें मुनिवराप्रति दाविलेंसे ॥ ६९ ॥
नमूनी सर्वात्मा हरि म्हणतसे आजि सुदिनीं ।
करावें कीं येथें मज गमतसे गायन मुनी ॥
मुनी चित्तीं भावी नृपति परि हा गोवळ खरा ।
वनौकांच्या[29] सार्थी मज म्हणतसे गायन करा ॥ ७० ॥

---

२८ मधुव्रत=भ्रमर. २९वनौकांच्या=अरण्यांत रहाणाऱ्या आस्वलाच्या.

